पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अधिनस्त विविध कार्यालयातील १७,१९१ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीटीई ३११८/प्र.क्र.१३/पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ सप्टेंबर, २०१८.

वाचा :-

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि. ०५.०३.२०१८.
२)शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३११८/ प्र.क्र.१३/पोल-३, दि. २०.०३.२०१८.
२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र जा.क्र.पोआ/कक्ष-२(६)/रवका /२५/१८, दि. २८.०८.२०१८
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि. ०७.०९.२०१८.

शासन निर्णय :-

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अधिनस्त विविध कार्यालयातील १७,१९१ अस्थायी पदांना गृह विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक-२ येथे नमूद दिनांक २० मार्च, २०१८ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१ मार्च, २०१८ ते दिनांक ३० सप्टेंबर, २०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली होती.

| अ.क्र. | पदनिर्मिती केलेल्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक | एकूण पदांची निर्मिती | मागील मुदतवाढ दिलेल्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| १. | गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक-एपीओ-३११०/ प्र.क्र.४२८/पोल-३, दिनांक १५ जून २०११, २५ जुलै २०११ व २३ ऑक्टोबर २०१३ | २,५६८ | शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३११८/ प्र.क्र.१३/पोल-३, दिनांक २० मार्च, २०१८. |
| २. | गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक-एपीओ-३१०६/ प्र.क्र.२२७/पोल-३, दिनांक २१ ऑगस्ट २००६ | २९ | शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३११८/ प्र.क्र.१३/पोल-३, दिनांक २० मार्च, २०१८. |
| ३. | गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक-एपीओ-३१०९/ ८३६/ प्र.क्र.३४०/पोल-३, दिनांक ३१ डिसेंबर २००९ | ३,३५६ | शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३११८/ प्र.क्र.१३/पोल-३, दिनांक २० मार्च, २०१८. |
| ४. | सन १९६४ ते २०१० या कालावधीत निर्गमित केलेले पदनिर्मितीचे ८० आदेश, दिनांक २७ एप्रिल १९६४ ते ३० जानेवारी २०१०<br>गृ.वि.शा.नि.क्र.संकीर्ण-१०१७/प्र.क्र.५४३/पोल-११, दिनांक ८ मे,२०१७ (उपजिल्हाधिकारी यांची ०२ पदे) | ९,५५० | शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३११८/ प्र.क्र.१३/पोल-३, दिनांक २० मार्च, २०१८. |
| ५. | गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक-एपीओ-३१११/ प्र.क्र.१०७(ब)/पुर्बा-२/पोल-३, दिनांक ४ मार्च २०१४ | १,५०० | शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३११८/ प्र.क्र.१३/पोल-३, दिनांक २० मार्च, २०१८. |
| ६. | गृ.वि.,शा.नि.क्र.एपीओ-३१११/प्र.क्र.१०७(अ)/पुर्बा-२/पोल-३, दिनांक ४ मार्च २०१४<br>गृ.वि., शा.नि.क्र.एपीओ-३६१६/प्र.क्र.८८/पोल-३, दिनांक ९ जानेवारी, २०१७<br>(कनिष्ठ स्थापत्य अभियंता यांची ०२ पदे) | ०२ | शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३११८/ प्र.क्र.१३/पोल-३, दिनांक २० मार्च, २०१८. |

| अ.क्र. | पदनिर्मिती केलेल्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक | एकूण पदांची निर्मिती | मागील मुदतवाढ दिलेल्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| ७. | गृ.वि.,शा.नि.क्र.अेपीओ-०३१५/प्र.क्र.११७/पोल-३, दिनांक १७ मे, २०१७. | १८६ | शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीटीई-३११८/ प्र.क्र.१३/पोल-३, दिनांक २० मार्च, २०१८. |
| -- | --- | १७,१९१ | --- |

२. आता पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अधिनस्त विविध कार्यालयातील वर तक्त्यात नमूद केलेल्या एकूण १७,१९१ अस्थायी पदांना **दिनांक ०१ ऑक्टोबर, २०१८ ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०१९** पर्यंत खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१) सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त पदे वगळून उर्वरित पदांना मुदतवाढ देण्यात यावी. तसेच पदे ज्या कारणास्तव ज्या अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर केली आहेत, त्याचे पालन करण्यात यावे.

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १० सप्टेंबर २००१ आणि क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/२००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १९ ऑगस्ट २००४ नुसार पदांच्या आढाव्याची कार्यवाही तातडीने पूर्ण करुन कार्यालयाचा सुधारित आकृतीबंध उच्चस्तरीय सचिव समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबतचा प्रस्ताव तात्काळ शासनास सादर करण्यात यावा.

३) आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेताना शासनाच्या कार्यपद्धतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाचा परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करुन अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा.

४) सदर कालावधीमध्ये कोणत्याही परिस्थितीत पदांचा आढावा उच्चस्तरीय समितीसमोर ठेवून मान्यता घेण्याबाबत वित्त विभागाने संदर्भाधिन क्र.३ येथील दिनांक ०७ सप्टेंबर, २०१८ च्या शासन निर्णयानुसार सूचित केलेले आहे. ही बाब विचारात घेता दिनांक २८ फेब्रुवारी, २०१९ अखेर पर्यंत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास, उपरोक्त अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी/ कर्मचारी यांच्या वेतन व भत्याचा प्रश्न निर्माण झाल्यास याबाबतची सर्वस्वी जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहिल.

५) गृह विभागाच्या क्र.सीटीई-३११५/प्र.क्र.२/पोल-३, दिनांक १६ जानेवारी २०१५ च्या पत्रातील माहितीसह मुदतवाढीचा एकच प्रस्ताव सादर करण्यात यावा.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक "बी-१, २०५५-पोलीस, १०८ राज्य मुख्यालय पोलीस, (०२)-शहर पोलीस (०२) (०१)-आस्थापना (२०५५००९७)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०७ सप्टेंबर, २०१८ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२८११२०१४३४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2018.09.28 11:26:46 +05'30'

**( दिनेश सस्ते )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
३) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई .
४) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
७) वित्त विभाग (व्यय-७)/वित्तिय सुधारणा-१.
८) निवड नस्ती.